**५० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय, जामनेर जि.जळगांव चे १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्थापना - २०१५ /प्र.क्र.२८२/आरोग्य-३**

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३१ डिसेंबर,२०१८

**वाचा -**

**आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक, संआसे/ कक्ष-३/न.क्र.श्रेणी - १६९/जामनेर/१०० खाटा/श्रेणीवर्धन/७८९९-७९०१/१५, दिनांक- ०४.०७.२०१५.**

**प्रस्तावना -**

जामनेर जि. जळगांव येथील ५० खाटांचे उपजिल्हा रुग्णालयाचे श्रेणीवर्धन करुन १०० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय, स्थापन करणेबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी मागणी केली आहे. त्यानुसार जामनेर जि.जळगांव येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयाचे १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

जामनेर जि. जळगांव येथील ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयाचे श्रेणीवर्धन करून १०० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर श्रेणीवर्धीत १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयासाठी विहित पध्दतीने जागा अधिग्रहीत करुन तेथे बांधकाम व पदनिर्मिती करणे याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२८१८०२४७७०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.12.31 15:30:14 +05'30'

**(रो.दि.कदम -पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, जळगांव.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव.
८. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, जामनेर जि.जळगांव
९. नियोजन विभाग,(का.१४७२) मंत्रालय,मुंबई
१०. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१२. निवडनस्ती (आरोग्य-३)